**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम नियम २००८ आणि सुधारित नियम, २०१२.**
**राज्यस्तरीय सनियंत्रण समितीची पुर्नरचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वहका-०९२२/प्र.क्र.१९५/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३१ मार्च, २०२३

वाचा :-

१. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: जजाप-२०२०/ प्र.क्र.१/ का.३, दि.२३ जुलै,२०२०.
३. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. वहका-२०२०/ प्र.क्र.११०/ का.१४, दि.२९ ऑक्टोंबर,२०२०
४. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.जसप-२०२०/ प्र.क्र.११५/ का.३, दि.०५ जानेवारी,२०२३.

प्रस्तावना :-

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ दिनांक ३१.१२.२००७ पासून राज्यात लागू झाला असून त्याखाली तयार केलेले नियम २००७, दिनांक ०१.०१.२००८ पासून अंमलात आलेले आहेत. सदर कायदयाची अंमलबजावणी योग्य रितीने व कालबध्द पध्दतीने करण्याकरिता या अधिनियमातील नियम ९ नुसार राज्य शासनातर्फे राज्यस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्याची तरतूद आहे. सदर समितीमध्ये नियम ९ (छ) येथील तरतूदीनुसार राज्य जनजाती सल्लागार परिषदेचे तीन अनुसूचित जमाती सदस्यांचे नामनिर्देशन जनजाती सल्लागार परिषदेच्या अध्यक्षाद्वारे करावयाचे आहे. वाचा मधील संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषदेची पुनर्रचना करण्यांत आली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये राज्य पातळीवर राज्यस्तरीय सनियत्रंण समिती गठीत करण्यांत आली होती. सद्यस्थितीत वाचा मधील संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषदेची पुनर्रचना करण्यांत आली आहे त्यामुळे राज्यस्तरीय सनियंत्रण समितीमध्ये महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषदेचे तीन अनुसूचित जमाती सदस्यांचा समावेश करुन सदरील समितीची पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ सुधारणा नियम, २०१२ च्या नियम ९ नुसार शासन पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय सनियंत्रण समितीची पुनर्रचना करीत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (महसूल) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (आदिवासी विकास विभाग) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव ( पंचायत राज व ग्राम विकास) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| ६ | प्रधान मुख्य वनसंरक्षक,नागपूर,महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ७ | आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य , नाशिक | सदस्य |
| ८ | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | सदस्य सचिव |
| **महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार समितीतून नामनिर्देशित तीन सदस्य** | | |
| ९ | श्रीमती मंजुळाताई गावित,मा.विधानसभा सदस्या | सदस्य |
| १० | श्री.भीमराव केराम, मा.विधानसभा सदस्य | सदस्य |
| ११ | श्री.श्रीनिवास चिंतामण वनगा, मा.विधानसभा सदस्य | सदस्य |

२. **राज्यस्तरीय सनियंत्रण समितीची कार्ये :-**

१. वन अधिकारांना मान्यता देण्याच्या आणि ते सुपूर्द करण्याच्या प्रक्रियेवर देखरेख करण्यासाठी निकष व निर्देशक तयार करणे.

२.राज्यातील वन अधिकारांना मान्यता देणे, त्यांची सत्यता तपासून ते सुपूर्द करणे या संपूर्ण प्रक्रियेवर देखरेख ठवेणे.

३.या अधिनियमान्वये मान्य केलेल्या दाव्यांचा तपशिल, फेटाळण्यात आलेल्या दाव्यांची कारणे आणि प्रलंबित दाव्यांची माहिती केंद्र शासनावास सादर करणे.

४.वनहक्क कायदयाच्या कलम ८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नोटीस मिळाल्यास संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द कायद्याखाली सुयोग्य कारवाई करणे.

५.वनहक्क कायद्यातील कलम ४ च्या पोटकलम २ खालील पुर्नस्थापनेच्या प्रक्रियेवर देखरेख ठेवणे.

३. **अशासकीय सदस्यांचा भत्ता :-**

राज्यस्तरीय सनियंत्रण समितीवर अशासकीय सदस्य म्हणून असणाऱ्या मा.विधानसभा सदस्य यांचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग-टिआरए-१४७०/१३१/अठरा, दिनांक २७.०१.१९७१ प्रमाणे आमदार यांना विधानमंडळाच्या कामकाजासाठी असलेल्या दराप्रमाणे नियमित केला जावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०३१५३७५८१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: CN = SATISH VITHALRAO KOVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.04.03 17:39:04 +05'30'

**( सतीश वि. कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
८. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव ,मंत्रालय,मुंबई.
९. मा. सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव.मंत्रालय,मुंबई.
१०. मा. सर्व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
११. मा. विधानसभा / विधान परिषद, सदस्य सर्व,विधानभवन,मुंबई.
१२. श्रीमती मंजुळाताई गावित,मा.विधानसभा सदस्या,विधानभवन,मुंबई.
१३. श्री.भीमराव केराम, मा.विधानसभा सदस्य,विधानभवन,मुंबई.
१४. श्री.श्रीनिवास चिंतामण वनगा, मा.विधानसभा सदस्य,विधानभवन,मुंबई.
१५. मा.सर्व सदस्य/कायम निमंत्रित सदस्य, महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषद
१६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१७. अपर मुख्य सचिव, (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. अपर मुख्य सचिव, (पंचायत राज व ग्राम विकास), मंत्रालय, मुंबई
१९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय,मुंबई.
२०. प्रधान सचिव, (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
२२. सर्व, विभागीय आयुक्त
२३. आयुक्त,आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
२४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२५. सर्व, जिल्हाधिकारी आयुक्त,
२६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती,
२७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
२८. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
२९. निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.